दिनांक १.४.१९९८ पूर्वीच्या घोषित अथवा अधिसूचित मालाच्या विक्रीच्या काही व्यवहारांवर विक्रीकर व अनुषंगिक व्याज व शास्तीची माफी देण्याबाबत.

महाराष्ट्र शासन

वित्त विभाग

शासन निर्णय, क्रमांक-विकआ-१०९९/प्रक्र.१८/कराधान-२.
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.

दिनांक:- ४ जून १९९९.

शासन निर्णय

१. सर्वश्री के.ए.के.अन्वर आणि कंपनी विरुध्द तामिळनाडू राज्य [१०८ एस.टी.सी. पृष्ठ क्र. २७८] यांच्या प्रकरणामध्ये सर्वोच्च न्यायालयाने, कच्ची चामडी व कमावलेली चामडी या दोन वस्तू भिन्न असल्याचा निर्णय दिला आहे. सदर निर्णयामुळे घोषित अथवा अधिसूचित मालावर प्रक्रिया केली असता भिन्न वस्तू तयार झाली पण त्या दोन्ही वस्तू एकाच नोंदीमध्ये असल्या तरी पुन्हा कर लागू होईल असे जाहीर झाले असून दिनांक १ एप्रिल १९९८ पासून सदर निर्णयाची अंमलबजावणी सुरु आहे.

२. त्याआधी असा कर लागू होईल हे उद्योजकांना व विक्रीकर खात्याला माहीत नव्हते, म्हणून १.४.१९९८ पूर्वीच्या कालावधीसाठी असा कर वसूल करणे अन्यायकारक होईल. त्यामुळे ज्या उद्योजकांचे दिनांक ३१.३.१९९८ पर्यंतच्या, अशा व्यवहारासाठी मुंबई विक्रीकर कायद्याअंतर्गत करदायित्व येईल त्यास माफी देण्याबाबतचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता. सदर प्रस्तावाचा काळजीपूर्वक विचार केल्यानंतर शासनाने खाली नमूद केल्याप्रमाणे निर्णय घेतला आहे.

३. दिनांक ३१.३.१९९८ पूर्वीच्या घोषित मालांच्या ज्या व्यवहारांवर नमूद केलेल्या मे.के.ए.के.अन्वर आणि कंपनी विरुध्द तामिळनाडू राज्य या प्रकरणातील सर्वोच्च न्यायालयाच्या निर्णयामुळे प्रतिकूल परिणाम होऊन करदायित्व निर्माण होणार असेल, अशा कराच्या

कृ.मा.प.

रकमेस व अनुषंगिक व्याज वा शास्तीत माफी देण्यात येत आहे. हा माफीचा निर्णय घोषित अथवा अधिसूचित मालावर प्रक्रिया केल्यामुळे दिनांक ३१.३.१९९८ पर्यन्तच्या व्यवहारांवर येणारे करदायित्व व त्या अनुषंगाने देय होणारे व्याज व शास्ती यांनाच लागू असेल. ज्या ठिकाणी कर वसूल केलेला असेल व करभरणा केलेला असेल त्या प्रकरणात अशी माफी मिळणार नाही.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

[ चित्रा कुलकर्णी ]
शासनाच्या अवर सचिव.

प्रति,

१] विक्रीकर आयुक्त, महाराष्ट्र राज्य, विक्रीकर भवन, माझगांव, मुंबई-४०००१०[४० प्रती.
२] सर्व विक्रीकर उपआयुक्त, महाराष्ट्र राज्य, विक्रीकर भवन, माझगांव, मुंबई-४०००१०.

प्रत:-

माहितीसाठी व आवश्यक त्या पुढील कार्यवाहीसाठी अग्रेषित.

१] महालेखापाल [लेखा परीक्षा]-१, महाराष्ट्र मुंबई.
२] महालेखापाल [लेखा परीक्षा]-२, महाराष्ट्र, नागपूर.
३] संचालक, लेखा व कोषागारे, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
४] अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
५] निवासी लेखा परीक्षक, मुंबई.
६] महासंचालक, माहिती व जनसंपर्क, संचालनालय, मुंबई.
७] निवड नस्ती, कराधान-१.